विक्रिकर निरीक्षक मुख्य परीक्षा - 2012



परीक्षा दि : 25/11/2012

CODE : OOI

प्रश्नपुस्तिका क्रमांक

BOOKLET NO.

प्रश्नपुस्तिका

एकूण प्रश्न : 200

एकूण गुण : 200

वेळ : 2 (दोन) तास

पेपर - 1 = मराठी व इंग्रजी

# सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 200 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|

केंद्राची संकेताक्षरे — शेवटचा अंक

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. **तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरूद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. खाली दिलेल्या स्पष्टीकरणाच्या अर्थाचा वाक्प्रचार ओळखा.

स्वाभिमान सोडून शरण जाणे.

(1) दात पाडणे (2) दाती तृण धरणे (3) दात दाखविणे (4) दाती बोट धरणे

---

2. 'काकांनी मला जत्रेतून एक चेंडू आणिला आणि ताईला बाहुली आणिली.'

या वाक्याचा प्रकार सांगा.

(1) संयुक्त वाक्य (2) मिश्र वाक्य (3) गौण वाक्य (4) शुद्ध वाक्य

---

3. समान अर्थाचा शब्द ओळखा –

'विमोचन'

(1) मुक्ती (2) आकुंचन (3) प्रसारण (4) संश्लेषण

---

4. शब्दसमूहासाठी योग्य शब्द निवडा.

'फौजेबरोबर असलेली अवांतर माणसे'

(1) शिपाईगडी (2) बाजारबुणगे (3) सेवेकरी (4) भोई

---

5. खालील वाक्य कोणत्या प्रकारचे वाक्य आहे ?

'तुम्ही आता बाहेर जा.'

(1) मिश्र वाक्य (2) शुद्ध वाक्य (3) गौण वाक्य (4) संयुक्त वाक्य

---

6. अधोरेखित शब्दाची जात ओळखा.

'कांगारू म्हणून एक सस्तन प्राणी आहे'

(1) स्वरूपबोधक उभयान्वयी अव्यय (2) उद्देशबोधक उभयान्वयी अव्यय

(3) संकेतदर्शक उभयान्वयी अव्यय (4) कारणदर्शक उभयान्वयी अव्यय

---

7. 'तुला जसे वाटेल तसे वाग,'

या वाक्यातील अधोरेखित वाक्य रीतीदर्शक __________ वाक्य आहे.

(1) क्रियाविशेषण वाक्य (2) विशेषण वाक्य (3) प्रधानवाक्य (4) नामवाक्य

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

8. यातील कोणते विरामचिन्ह <u>अपसारण चिन्ह</u> आहे ?

(1) . (2) ? (3) “ ” (4) –

9. ‘माझ्या ग घरावरून कुण्या ग राजाचा हत्ती गेला’

वरील विधानात कोणती शब्दशक्ती आली आहे ?

(1) अभिधा (2) लक्षणा (3) व्यंजना (4) गौणी सोरापा

10. ‘गडी <u>गायरानात</u> गुरे घेऊन गेला आहे’

वरील अधोरेखित शब्द कोणत्या प्रकारात येतो ?

(1) सामासिक शब्द (2) अध्यस्त शब्द (3) तत्सम शब्द (4) तद्भव शब्द

11. खालील म्हण पूर्ण करा.

‘श्री’ च्या मागोमाग ________ येतो.

(1) ‘ज्ञ’ (2) ‘ग’ (3) ‘क’ (4) ‘छ’

12. पर्यायी उत्तरातील ‘तोळंबा’ या शब्दाचा समानार्थी नसलेला शब्द कोणता ?

(1) धष्टपुष्ट शरीर (2) तोष (3) लंबक (4) तुळई

13. पर्यायी उत्तरातून खालील वाक्यातील लक्षार्थ ओळखा.

‘तो कप पिऊन टाक.’

(1) भाकरी खा (2) भात देऊन टाक (3) चहा पी (4) रोटी दे

14. खालील वाक्य कोणत्या वाक्य प्रकारातील आहे ?

‘जे विद्यार्थी चांगला अभ्यास करितात ते पास होतात.’

(1) मिश्र वाक्य (2) शुद्ध वाक्य (3) गौण वाक्य (4) संयुक्त वाक्य

15. खालील वाक्याचा प्रयोग सांगा.

‘पारिजातकाची योजना करणारा कवी खरोखरच कल्पक असला पाहिजे.’

(1) कर्तरी प्रयोग (2) भावे प्रयोग (3) कर्मणी प्रयोग (4) संकीर्ण प्रयोग

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

16. "आज संपत्ती त्याजपाशी आहे."

या वाक्यातील मूळ उद्देश्य कोणते ?

(1) आज (2) त्याजपाशी (3) संपत्ती (4) आहे

---

17. 'मरावे परी कीर्तिरूपे उरावे'

या वाक्यातील उभयान्वयी अव्यय कोणते ?

(1) कीर्ति (2) रूपे (3) परी (4) उरावे

---

18. नकारार्थी वाक्यात रूपांतर करा.

'गुणेशचे चित्र खराब आहे'.

(1) गुणेशचे चित्र चांगले नाही. (2) गुणेशचे चित्र बरे आहे.

(3) गुणेशचे चित्र साधारण नाही. (4) गुणेशचे चित्र वाईट नाही.

---

19. हल्ली सज्जन मित्र मिळणे कठीण झाले आहे.

अधोरेखित शब्दांचे विशेषण प्रकार ओळखा.

(1) साधित विशेषण (2) परिणाम दर्शक विशेषण

(3) नामसाधित विशेषण (4) अविकारी विशेषण

---

20. 'तो तेथेच राहिला'

वरील वाक्याचा प्रकार सांगा.

(1) संयुक्त वाक्य (2) शुद्ध वाक्य (3) मिश्र वाक्य (4) गौण वाक्य

---

21. खालीलपैकी पर्यायी उत्तरांतून विसंगत जोडी ओळखा.

(1) चोराच्या उलटया बोंबा - खोडया करून पुन: स्वत:च आरडाओरड करणे.

(2) चोरावर मोर - एका चोरापासून वस्तू उपटून नेणारा सवाई.

(3) चोराला सोडून संन्याशाला सुळी - खऱ्या अपराध्याला शिक्षा करणे.

(4) चोराच्या मनात चांदणे - वाईट कृत्य उघडकीस येईल म्हणून भीती वाटणे.

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

22. खालील म्हण पूर्ण करा.

केळी खाता हरखले __________ देता चरकले.

(1) हिशेब (2) पाणी (3) दूध (4) अन्न

---

23. खालील पर्यायी उत्तरांतील समानार्थी नसलेला शब्द कोणता ?

(1) ख (2) आकाश (3) पौर्णिमा (4) अंबर

---

24. 'सुताराने पाळणा केला'

या वाक्यातील अधोरेखित शब्दास वाक्यपृथक्करणात काय म्हणतात ?

(1) मूळ उद्‌देश्य (2) विधेय पूरक (3) उद्देश्य विस्तारक (4) मूळ विधेय

---

25. संस्कृत शब्दात बदल होऊन आलेल्या शब्दांना __________ असे म्हणतात.

रिकाम्या जागी अचूक पर्याय शोधून लिहा :

(1) तद्‌भव (2) तत्सम (3) देश्य (4) गुजराती

---

26. पर्यायी उत्तरांतील कोणता शब्द गटाबाहेरचा आहे ?

(1) त्रिभुवन (2) त्रिदल (3) चौघडी (4) त्रैलोक्य

---

27. खालील शब्दांचे, ज्या गटात अर्थ अधिक अचूक आहेत असा गट ओळखा -

'कळ'

(1) दुःख, सुख (2) कुरापत, संकट (3) किल्ली, वेदना (4) काळजी, कळकट

---

28. खालील सामासिक शब्दाचा प्रकार सांगा ?

'प्रतिवर्षी'

(1) तत्पुरुष समास (2) द्वंद्व समास (3) अव्ययीभाव समास (4) द्विगू समास

---

29. अधोरेखीत शब्दाची जात ओळखा.

'आम्ही जाऊ नाहीतर राहू, तुला काय त्याचे' ?

(1) प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्यय (2) समुच्चयबोधक उभयान्वयी अव्यय

(3) विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय (4) उद्देश्यबोधक उभयान्वयी अव्यय

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

**30.** असे म्हणतात की,

‘ __________ दक्षिणा लक्ष प्रदक्षिणा’.

(1) थोडी (2) अल्प (3) पै (4) शेकडो

---

**31.** ‘पंचमुखी हनुमान’ हे कोणते विशेषण आहे.

(1) अव्यय साधित विशेषण (2) धातुसाधित विशेषण

(3) समासधरित विशेषण (4) संबंधी विशेषण

---

**32.** ‘येथे कसा, काय प्रकार घडला, की तो मला माहीत नाही.’

हे वाक्य कोणत्या प्रकारचे आहे ?

(1) गौण वाक्य (2) संयुक्त वाक्य (3) मिश्र वाक्य (4) केवल वाक्य

---

**33.** खालीलपैकी ‘दंततालव्य’ वर्ण कोणता ?

(1) र (2) ग (3) ज् (4) म्

---

**34.** ‘गरज ही कल्पकतेची आई होय,’ या वाक्यातील आई या शब्दाचा लक्ष्यार्थ कोणता ?

(1) माता (2) उत्पत्तीचे कारण (3) जन्मदात्री (4) माउली

---

**35.** पुढील पर्यायातून ‘कन्नड’ शब्दगट शोधा :

(1) अण्णा, अप्पा, ताई (2) अत्तर, इमान, खलाशी

(3) पोषाख, बगीचा, बागाईत (4) टेबल, पोस्ट, स्टेशन

---

**36.** पुढील वाक्यातील ‘प्रयोग’ ओळखा.

‘आईवडिलांनी मुलांना मायेने वाढविले’.

(1) कर्तरी प्रयोग (2) कर्मणी प्रयोग (3) भावे प्रयोग (4) संकरित प्रयोग

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

37. खालील वाक्प्रचार व त्याचा अर्थ यातून विसंगत जोडी ओळखा.

(1) कास धरणे-मोठ्याच्या आश्रयाला जाणे (2) कोंबडे झुंजविणे-भांडण लावून मजा पाहणे

(3) कळा पालटणे-रूप पालटणे (4) कणीक तिंबणे-डोके दुखू लागणे

38. 'चिल्ली पिल्ली' हा शब्द कोणत्या भाषेतून आला आहे ?

(1) तमीळ (2) तेलगू (3) गुजराती (4) फारसी

39. खाली सारख्या अर्थाच्या दोन म्हणी यांची जोडी दिली आहे त्यातील विसंगत म्हणीची जोडी ओळखा.

(1) घोडे कमावते गाढव खाते - घोड्याएवढे डोके गाढवाऐवढी अक्कल

(2) ओसाड रानात एरंडाचा उदोउदो - वासरात लंगडी गाय शहाणी

(3) कोठे इंद्राचा ऐरावत नि कोठे शामभटाची तट्ट्राणी - कोठे राजा भोज अन् कोठे गंगू तेली

(4) गवयाचे पोर रडले तरी सुरातच रडणार - खाण तशी माती

40. खालील संयुक्त वाक्य कोणत्या प्रकारचे आहे ?

'सगळे काही त्याला माहीत आहे, पण लक्षात कोण घेतो ?'

(1) न्यूनत्व बोधक (2) परिणाम बोधक (3) विकल्प बोधक (4) समुच्चय बोधक

41. अधोरेखित शब्दाची जात ओळखा.

'भयंकर वादळ सुटले आणि पत्रे उडून गेले.'

(1) गौणत्वसुचक उभयान्वयी अव्यय (2) प्रधानत्वसुचक उभयान्वयी अव्यय

(3) उद्देशबोधक उभयान्वयी अव्यय (4) समुच्चयबोधक उभयान्वयी अव्यय

42. 'पगार' हा शब्द कोणत्या भाषेतून मराठीत आलेला आहे ? योग्य पर्याय निवडा.

(1) गुजराती (2) पोर्तुगीज (3) इंग्रजी (4) फारसी

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

43. 'घरात जा व पाणी आण,'

वरील वाक्य कोणत्या प्रकारचे वाक्य आहे?

(1) मिश्र वाक्य (2) संयुक्त वाक्य (3) शुद्ध वाक्य (4) गौण वाक्य

---

44. समानार्थी शब्द ओळखा.

अभिनिवेश

(1) जोम (2) अभिनय (3) अभिमान (4) प्रवेश

---

45. मूळच्या शब्दांना __________ म्हणतात.

रिकाम्या जागी अचूक पर्याय लिहा :

(1) सिद्ध शब्द (2) साधित शब्द (3) उपसर्ग (4) प्रत्यय

---

46. 'समाजात वावरणारे असले साप ठेचून काढले पाहिजेत,' या वाक्यातून कोणता अर्थ प्रकट होतो?

(1) व्यंग्यार्थ (2) वाच्यार्थ (3) लक्ष्यार्थ (4) रूढार्थ

---

47. उषःकाल होता होता, काळरात्र झाली...... या पंक्तीतून कोणता अर्थ व्यक्त होतो?

(1) वाच्यार्थ (2) शब्दार्थ (3) व्यंगार्थ (4) यापैकी नाही

---

48. खालील पर्यायी उत्तरातील शुद्ध पर्यायी शब्द सांगा.

(1) अग्नीहोत्री (2) अग्निहोत्री (3) आग्नीहोत्री (4) आग्निहोत्री

---

49. पर्यायी उत्तरांतील कोणता शब्द 'अंशाभ्यस्त विशेषण' आहे?

(1) आगतस्वागत (2) गेलाबिला (3) वाईटसाईट (4) उद्याबिद्या

---

50. 'आपण' या सर्वनामाचा अर्थ जेव्हा 'स्वतः' असा होतो, तेव्हा ते __________ सर्वनाम असते.

(1) पुरुषवाचक (2) दर्शक (3) आत्मवाचक (4) प्रश्नार्थक

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

51. पर्यायी उत्तरातील 'अ' व 'ब' या शब्दगटातून विरूद्ध अर्थी शब्द जोडी कोणती ती शोधा.

| | 'अ' | 'ब' |
|---|---|---|
| (1) | अश्व | वाजी |
| (2) | हय | घोडा |
| (3) | अनुज | अग्रज |
| (4) | वारू | तुरंग |

---

52. पर्यायी उत्तरांतील कोणता शब्द 'अव्ययअंशाभ्यस्त' शब्द आहे ?

(1) कडूबिडू (2) आगेमागे (3) बोलणेचालणे (4) पोरसोर

---

53. विशेषत: काव्याला सूचकता आणणारी व काव्य अधिक परिणामकारक ठरविणारी शब्दशक्ती कोणती ? पर्यायी उत्तरांतून योग्य उत्तर शोधा.

(1) अभिधा (2) लक्षणा (3) व्यंजना (4) धववाणी

---

54. 'द्विगुणित आनंद' या शब्दातील 'द्विगुणित' शब्द __________ संख्याविशेषण आहे.

(1) क्रमवाचक (2) आवृत्तिवाचक (3) अनिश्चित (4) गणनावाचक

---

55. 'मौळी' या शब्दाला समानार्थी शब्द कोणता आहे ?

(1) छातीचा पिंजरा (2) मस्तक (3) मान (4) गाल

---

56. पर्यायी उत्तरांतून योग्य ते उत्तर सांगा ?

'ईश्वरनिर्मित'

(1) नञतत्पुरुष समास (2) तृतीया तत्पुरुष समास (3) प्रादी समास (4) कर्मधारय समास

---

57. पर्यायी शब्दातील 'मिठी' या शब्दाचा समानार्थी शब्द कोणता ?

(1) आवड (2) मिती (3) तिथी (4) प्रमाण

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

58. पर्यायी उत्तरांतील कोणता शब्द 'नामअंशाभ्यस्त' आहे ?

(1) झाडबिड (2) इकडेतिकडे (3) निरखणेपारखणे (4) फुटकातुटका

59. पर्यायी उत्तरांतून खालील शब्दाचा विरूद्ध अर्थी शब्द सांगा.

'विधायक'

(1) विदेशी (2) विसंगत (3) विध्वंसक (4) विजातीय

60. खालील केवलप्रयोगी अव्ययातील आश्चर्यबोधक केवल प्रयोगी अव्यय ओळखा.

(1) अहाहा! (2) अरेरे! (3) बापरे! (4) छे छे!

61. 'नवोढा' या शब्दाला समानार्थी शब्द कोणता ?

(1) कुमारिका (2) गृहिणी (3) लेकुरवाळी (4) नववधू

62. 'अननस, बिजागरी' हे शब्द कोणत्या भाषेतून आले आहेत ?

(1) पोर्तुगीज (2) कानडी (3) तेलगू (4) फारसी

63. विशेषण ज्या नामाबद्दल, विशेष अशी माहिती सांगते त्या नामाला __________ असे म्हणतात.

(1) विशेष्य (2) अव्यय सदृश्य सर्वनाम (3) धातुसाधित (4) अव्ययसाधित

64. खालील पर्यायी उत्तरांतून समानार्थी शब्द असलेले वाक्य सांगा.

(1) निर्मलाचे सासरमाहेर जवळच आहे.

(2) त्याने कधी पापपुण्याचा विचार केला नाही.

(3) त्यात आश्चर्यनवल वाटावयाचे काहीच कारण नाही.

(4) सुरसनिरस गोष्टी सर्वांना आवडतातच असे नाही.

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

65. 'तिने भिकाऱ्याला पैसा दिला,' हे वाक्य क्रियापदांच्या कोणत्या प्रकारातील आहे?

(1) विधानपूरक (2) फक्त सकर्मक (3) द्विकर्मक (4) उभयविध

---

66. 'हालअपेष्टा सहन करण्याचा गुण' चा शब्दसमूहासाठी एक शब्द शोधा.

(1) तितिक्षा (2) गरीब (3) दयाळु (4) मायाळु

---

67. 'जो मनुष्य चोरी करतो, त्यास शिक्षा होते.'

या वाक्यातील अधोरेखित वाक्य कोणत्या प्रकारचे वाक्य आहे?

(1) मिश्र वाक्य (2) केवल वाक्य (3) गौण वाक्य (4) संयुक्त वाक्य

---

68. 'मी नदीच्या काठाने गेलो'

अधोरेखित शब्दाच्या विभक्तीचा कारकार्थ ओळखा.

(1) करण (2) अधिकरण (3) कर्ता (4) कर्म

---

69. संधी सोडवा, 'सदाचार'.

(1) स + दाचार (2) सदा + आचार (3) सत् + आचार (4) सद् + आचार

---

70. पुढील वाक्यातील मूल-विधेय कोणते आहे?

''पूर्वी घडून आलेला आणखी एक प्रसंग सांगण्यासारखा आहे.''

(1) आणखी एक (2) प्रसंग (3) आहे (4) सांगण्यासारखा

---

71. 'गुरुजी म्हणाले की, एकी हेच बळ.'

या वाक्यातील गौणवाक्य कोणते?

(1) गुरुजी म्हणाले (2) गुरुजी म्हणाले की (3) एकी हेच बळ (4) म्हणाले की

---

72. 'अक्कलहुशारी' हा शब्द _________ आहे.

(1) अंशाभ्यस्त शब्द (2) पूर्णाभ्यस्त शब्द (3) अनुकरणवाचक शब्द (4) नादानुकारी शब्द

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

73. ''हवा कोंदट असल्यास मनुष्याची प्रकृती बिघडते.''

वरील वाक्यातील विधेय विस्तारक कोणते ?

(1) हवा कोंदट असल्यास (2) मनुष्याची (3) प्रकृती (4) बिघडते

---

74. खालील पर्यायी उत्तरातील कोणत्या शब्दाला 'उपसर्ग' लावून 'क्रीडा' हा शब्द बनविला आहे ?

(1) प्र + हार (2) वि + हार (3) आ + हार (4) अप + हार

---

75. 'सिद्ध' शब्दाचे किती प्रकार पडतात ?

(1) तीन (2) दोन (3) पाच (4) चार

---

76. खालील म्हण पूर्ण करा.

चुलीपुढे शिपाई अन् घराबाहेर __________ .

(1) शिकारी (2) कसाई (3) भागुबाई (4) गवई

---

77. सर्वनामाचा प्रकार ओळखा :

'जो'

(1) पुरुषवाचक सर्वनाम (2) दर्शक सर्वनाम

(3) संबंधी सर्वनाम (4) अनिश्चित सर्वनाम

---

78. 'दुर्वास शकुंतलेला शाप देतो' या विधानात __________ कर्मे आहेत.

रिकाम्या जागी अचूक पर्याय शोधून लिहा.

(1) एक (2) दोन (3) तीन (4) चार

---

79. खालीलपैकी पूर्णअभ्यस्त शब्द कोणता ?

(1) बाजारहाट (2) पूजाविधी (3) वंदनबिंदन (4) पुनः पुनः

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

80. पर्यायी उत्तरांतील समानार्थी शब्दगटाच्या बाहेरचा शब्द कोणता ?

(1) केसरी (2) पंचानन (3) मृगेंद्र (4) शाखामृग

81. 'र्' या व्यंजनाची जोडाक्षरे लिहिण्याच्या किती पद्धती आहेत ?

(1) एक (2) दोन (3) तीन (4) चार

82. 'छी! किती घाणेरडा आहेस तू' या वाक्यातील केवलप्रयोगी अव्ययाचा प्रकार ओळखा.

(1) तिरस्कार दर्शक केवलप्रयोगी अव्यय (2) शोकदर्शक केवलप्रयोगी अव्यय

(3) आश्चर्यदर्शक केवलप्रयोगी अव्यय (4) विरोधदर्शक केवलप्रयोगी अव्यय

83. वाक्यसंश्लेषण करा.

'त्या वृद्धाला आता कोणतीही इच्छा राहिली नाही'.

(1) तो वृद्ध स्वेच्छ आहे. (2) तो वृद्ध निरिच्छ आहे.

(3) तो वृद्ध सकाम आहे. (4) तो वृद्ध निष्कांचन आहे.

84. पर्यायी उत्तरांतील 'अ' व 'ब' गटातील विषमार्थी जोडी कोणती ?

| | 'अ' | 'ब' |
|---|---|---|
| (1) | सविता | कांचन |
| (2) | स्त्री | ललना |
| (3) | महिला | वनिता |
| (4) | नारी | अबला |

85. पर्यायी सामासिक शब्दांत गटाबाहेरचा सामासिक शब्द कोणता ?

(1) नि:शब्द (2) अनेक (3) नीरस (4) सादर

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

86. 'कडा' या शब्दाचे सामान्यरूप ओळखा.

(1) कडया (2) कडयावर (3) कडयाला (4) कडयावरून

87. पर्यायी उत्तरांतून खालील वाक्य कोणत्या प्रकारचे आहे ते सांगा?

'मी खात्रीने पास होईन.'

(1) आज्ञार्थी (2) विद्यर्थी (3) स्वार्थी (4) नकारार्थी

88. खालीलपैकी शुद्ध शब्द कोणते?

(1) चिंचा, खिंड, टिंबं (2) चींच, खींड, टिंब (3) चिंच, खिंड, टिंब (4) चींच, खींड, टींब

89. योग्य अर्थाची म्हण शोधा.

रामजीने आपल्या नोकरांकडून भरपूर काम करून घेतले-मात्र त्याचा मोबदला खूप कमी दिला.

(1) दुरून डोंगर साजरे (2) पळसाला पाने तीनच

(3) दाम करी काम (4) वरील कोणतीही नाही

90. 'माझे पुस्तक' शब्दातील 'माझे' हा शब्द __________ आहे.

(1) सार्वनामिक विशेषण (2) क्रियापद (3) नाम (4) अव्यय

91. पर्यायी उत्तरांत धातुसाधित शब्दांतील गटाबाहेरील शब्द कोणता?

(1) वेडा (2) ठेवा (3) ठेचा (4) सुका

92. 'अरसिकाला काव्याचे परीक्षण करण्यास सांगणे हे निरर्थक आहे, उपहासास्पद आहे.'

वरील वाक्याची अचूक म्हण सांगा.

(1) गाढवाने शेत खाल्ल्याचे पाप ना पुण्य.

(2) गाढवाला गुळाची चव काय माहीत?

(3) गाढवापुढे वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता.

(4) गाढवांचा गोंधळ लाथांचा सुकाळ.

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

93. 'हसणे' हा मनुष्यस्वभाव आहे.

या वाक्यातील 'हसणे' हा शब्द _________ आहे.

(1) धातुसाधित नाम (2) सर्वनाम (3) विशेषण (4) क्रियापद

---

94. सर्वनामाचे एकूण मूळ _________ प्रकार पडतात.

रिकाम्या जागी अचूक पर्याय शोधून लिहा.

(1) नऊ (2) तीन (3) चार (4) सात

---

95. खालील वाक्य कोणत्या वाक्य प्रकारातील आहे, हे पर्यायी उत्तरांतून शोधून काढा.

'जो आवडतो सर्वांना तोची आवडे देवाला.'

(1) नामवाक्य (2) विशेषण वाक्य (3) क्रियाविशेषण वाक्य (4) संयुक्त वाक्य

---

96. 'मला दोन मैल चालवते.' या वाक्यातील क्रियापदाचा प्रकार कोणता ?

(1) प्रयोजक क्रियापद (2) संयुक्त क्रियापद

(3) शक्य क्रियापद (4) अनियमित क्रियापद

---

97. 'येते' या क्रियापदात मूळ शब्द _________ हा आहे.

(1) ते (2) येते (3) ये (4) येणे

---

98. ''कच्छपी लागणे'' या वाक्प्रचाराचा अचूक अर्थ सांगा.

(1) व्यर्थ समजूत काढणे (2) एखाद्याच्या नादी लागणे

(3) तहान लागणे (4) जबाबदारी दुसऱ्यावर सोपविणे

---

99. पुढील शब्दाचा समास ओळखा.

'अनंत'

(1) नञ बहुव्रीही समास (2) द्विगू समास

(3) समाहार द्वंद्व-समास (4) मध्यमपदलोपी समास

---

कच्च्या कामासाठी जागा /SPACE FOR ROUGH WORK

100. पर्यायी उत्तरांतील उद्देशदर्शक क्रियाविशेषणाचे वाक्य कोणते ?

(1) शरीर घाटदार व्हावे म्हणून आम्ही व्यायाम करतो.

(2) जेथे जातो तेथे तू माझा सांगाती.

(3) तुला जसे वाटेल तसे वाग.

(4) जेव्हा घाम गाळावा तेव्हाच खायला भाकरी मिळते.

---

101. खालील शब्दाचा समानार्थी शब्द ओळखा

'अद्वैत'

(1) वैर (2) ऐक्य (3) द्वंद्व (4) दुही

---

102. 'वाटेत मोटार नादुरुस्त झाली म्हणून मला यावयास उशीर झाला.'

वरील वाक्य संयुक्त वाक्याच्या कोणत्या प्रकारातील आहे ?

(1) समुच्चयबोधक (2) विकल्पबोधक (3) न्यूनत्व बोधक (4) परिणाम बोधक

---

103. 'तो घरी खात्रीने येईल' या वाक्याचे योग्य वाक्यरूपांतर कोणते ?

(1) तो घरी येणार नाही. (2) तो घरी आल्याशिवाय राहायचा नाही.

(3) तो घरी यावा. (4) तो घरी येईल असे वाटते.

---

104. खाली म्हणी व त्यांचा अर्थ दिला आहे. त्यातील चुकीच्या अर्थाची जोडी ओळखा.

(1) ओढाळ गुराला लोढणे गळ्याला - गुन्हेगाराला कायद्याचा वचक बसायलाच हवा.

(2) कानाला ठणका नाकाला औषध - दुखणे एके ठिकाणी आणि उपाय भलतीकडेच.

(3) आठ पूरभय्ये नि नऊ चौबे - सर्वांनी सहकार्य केले तर मोठे कार्य पार पडते.

(4) कुडी तशी पुडी - शरीर प्रकृतीप्रमाणे माणसाचा आहार असतो.

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

**105.** 'विजयनगरच्या साम्राज्याचा जेथे अंत झाला'

या वाक्यातील उद्देश्य कोणते ?

(1) जेथे (2) अंत (3) झाला (4) विजयनगरच्या साम्राज्याचा

---

**106.** खालील पर्यायातील योग्य पर्याय कोणता ?

'कुणकुण लागणे'

(1) पाय लागणे (2) हात लागणे (3) चाहूल लागणे (4) डोळा लागणे

---

**107.** खालील म्हण पूर्ण करा.

संग तसा __________ .

(1) श्रीरंग (2) रंग (3) पांडुरंग (4) विहंग

---

**108.** एका केवल वाक्यात रूपांतर करा.

'हे लोकशाहीचे युग आहे. वेळीच जागे व्हावे.'

(1) हे लोकशाहीचे युग असल्याने वेळीच जागे व्हावे.

(2) लोकशाही युगात वेळीच जागे व्हावे.

(3) वेळीच जागे व्हावे कारण हे लोकशाहीचे युग आहे.

(4) ह्या लोकशाहीच्या युगात वेळीच जागे झालेले चांगले.

---

**109.** 'मग त्यावर आकाशातल्या पणत्या तेवत असतात.'

वरील वाक्यातील विधेय विस्तार सांगा.

(1) आकाशातल्या (2) पणत्या (3) मग त्यावर (4) तेवत असतात

---

**110.** 'अं व अ: हे __________ आहेत.'

(1) व्यंजनादी (2) व्यंजन (3) स्वरादी (4) व्यंजनांत

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

**खालील उतारा वाचून त्याखालील प्रश्न क्रमांक 111 ते 115 यांची उत्तरे द्या -**

एका घराचे दगड काढून दुसऱ्या घरास लावावयाचे असले तरी किती त्रास पडतो हे सर्वांस माहीत आहेच. पण हेच दगड चुन्यात पक्के बसविलेले असले तर फारच त्रास पडतो, आणि त्यांतहि पहिली इमारत बांधल्यापासून बरीच वर्षे लोटली असली, व चुन्याचा आणि दगडांचा एकजीव होऊन गेला असला, तर एकेक दगड सोडविण्यास किती मारामार पडते, हे कोणास सांगावयाला पाहिजे असे नाही ; तात्पर्य, कोणत्याहि जड द्रव्यांचा संनिकट संयोग करून त्यापासून एक पिंड केला असता तो पिंड मोडून त्याच्या घटकांचा निराळा पिंड बनविणे हे अतिशय कष्टाचे काम आहे, हे प्रत्येकाने कबूल केले पाहिजे.

सामाजिक घडामोडींचाहि असाच प्रकार आहे, प्रथम व्यक्तीच्या शरीररचनेचा विचार करा. आरंभी हे शरीर समजातीय द्रव्याचे झालेले असून, पुढे ते जसजसे वाढत जाते तसतसे त्यांत विषमजातित्व उत्पन्न होते ; व ज्या मानाने त्यात विषमजातित्व उत्पन्न होते त्या मानाने त्यात अधिकाधिक दाढर्य उत्पन्न होऊन बाह्य संस्कारात ते अधिकाधिक प्रतिबंध करूं लागते. कोवळे वेळू, लहान झाडांच्या फांद्या किंवा तरुण मुलांचे अवयव यात किती लवचिकपणा असतो बरे ? वाढ खुंटून प्रत्येक अवयवात काठिण्य आल्यावर, कोणत्याहि मनुष्यास चांगली कसरत शिकता येत नाही, ही प्रत्येकाच्या पाहण्यातली गोष्ट आहे. सामाजिक शरीरातहि परिणतीमुळे अशाच तऱ्हेचे काठिण्य उद्‌भूत होते. कोणताहि समाज एकदा वाढीस लागला, आणि श्रमविभागामुळे त्यास भिन्नावयवित्व प्राप्त झाले, व त्यात निरनिराळे वर्ग उत्पन्न होऊन ते निरनिराळ्या क्रिया करू लागले म्हणजे त्याचे रूपांतर करू पाहणाऱ्या गोष्टीस त्याकडून मोठा प्रतिबंध होऊ लागतो. राज्य, धर्म, सैन्य, लोकाचार यासंबंधाने ज्या रीति एकदा रूढ होऊन जातात त्यात फिरून बदल करणे अत्यंत दुरापास्त होऊ लागते, पूर्वापार चालत आलेल्या चालीत विचारदृष्ट्या कितीहि विसंगतता दिसली तरी त्या सोडणे किती जिवावर येते हे बाल-विवाह, केशवपन, सुतक इत्यादि प्ररूढ चालीचा विचार करता, तेव्हांच लक्षात येणार आहे. समाजातील शेकडा नव्याण्णव लोकांची स्थिति अंधपरंपरेप्रमाणे असते. मळलेल्या वाटेच्या बाहेर एक पाऊल टाकल्यानेसुद्धा आपणावर मोठा भयंकर प्रसंग गुदरेल असा धाक त्यास क्षणोक्षणी वाटत असतो.

---

**111.** उताऱ्याला योग्य शीर्षक द्या :

(1) सामाजिक घडामोड (2) राज्यधर्म लोकाचार

(3) शरीर रचनेचा विचार (4) बदलता समाज

---

**112.** कोणत्या संबंधाने रीती रूढ होतात ?

(1) चालीरीतीमुळे (2) सामाजिक संकेतामुळे

(3) रीतिभातीमुळे (4) राज्य, धर्म, सैन्य, लोकाचार

---

**113.** चांगली कसरत केव्हा करता येत नाही ?

(1) व्यायाम करताना (2) वाढ खुंटून प्रत्येक अवयवात काठिण्य आल्यावर

(3) चांगला प्रतिसाद मिळाल्यावर (4) सामाजिक घडामोड झाल्यावर

---

**114.** सामाजिक शरीरांमध्ये काठिण्य कशामुळे उद्‌भवते ?

(1) परिणतीमुळे (2) सामाजिकतेमुळे (3) वादामुळे (4) घडामोडीमुळे

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

**115.** लवचिकपणा कोणात असतो ?
(1) सामाजिक घडामोडित
(2) शरीर रचनेत
(3) बाह्यरचनेत
(4) कोवळे वेळू, झाडांच्या फांदया तरूण मुलांचे अवयव

---

**खालील उताऱ्यावरील प्रश्न क्र. 116 ते 120 या प्रश्नांची उत्तरे लिहा.**

**उतारा**

गाडगे महाराज हे महान समाजसुधारक संत होऊन गेले. दारिद्र्य, अज्ञान, अंधश्रद्धा, देवधर्म, कर्मकांड, भोळेपणा, जातपात व व्यसने यांत बुडून गेलेल्या समाजाला त्यांनी नवा मार्ग दाखवला. त्यासाठी त्यांनी केवळ भाषणबाजी केली नाही. त्यांच्या हातातील खराटा हेच त्यांचे साधन होते. गावातील गलिच्छ वस्त्या ते झाडून स्वच्छ करीत. पुढे जनमानसातील कचरा साफ करण्याचे अखंड व्रत आयुष्यभर चालवले. फुकटचे त्यांनी स्वत: कधी खाल्ले नाही व इतरांना खाऊ दिले नाही. श्रमांना प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. गरिबीचे मूळ अज्ञानात, व्यसनात, गलिच्छपणात व आळसात आहे हे त्यांनी लोकांना पटवले. लक्षावधी रुपये वर्गणीरूपाने जमवून त्यांनी धर्मशाळा, गोशाळा, पाठशाळा, पाणपोया बांधल्या व लोकहिताची कामे केली. यात्रा-मेळे यांना ते जात ते जनताजनार्दनांच्या सेवेसाठी. आंधळ्यांची, अपंगांची, रंजल्यागांजल्यांची सेवा हीच त्यांनी विठ्ठलाची भक्ती मानली. लक्षावधी रुपये जमवून त्यांतील पैचाही विनियोग त्यांनी कधी स्वत:साठी केला नाही. पै-पैचा हिशोब ते वहीत टिपून ठेवत. ती चोपडी सदैव त्यांच्या गळ्यात अडकवलेली असे. कुणीही येऊन त्यांचे हिशोब पाहू शकत असे. त्यांचा व्यवहार कसा खुल्लमखुल्ला होता. स्वत:च्या बायकोने आजारपणात गोशाळेतील गाईचे दूध घेतले, म्हणून तशाही अवस्थेत त्यांनी तिला सबंध गोशाळा साफ करण्याची शिक्षा दिली. सार्वजनिक जीवनात आर्थिक व्यवहार सांभाळणारा मनुष्य किती स्वच्छ असावा याचा गाडगेबाबा हे एक अत्युच्च आदर्शच होते.

---

**116.** उताऱ्यातील 'विनियोग' या शब्दाचा अर्थ –
(1) खर्च
(2) बेहिशोबी
(3) योगायोग
(4) दुरुपयोग

---

**117.** गाडगे महाराजांनी गोशाळा साफ करण्याची शिक्षा कुणाला दिली ?
(1) कन्येला
(2) पत्नीला
(3) पुत्राला
(4) स्वत:ला

---

**118.** गाडगेबाबा यात्रेला का जात ?
(1) देवदर्शनासाठी इतर जातात म्हणून जात.
(2) मजा वाटावी म्हणून.
(3) लोकांच्या सेवेसाठी.
(4) केवळ भाषणे करण्यासाठी

---

**119.** गरिबीचे मूळ कशात आहे, असे गाडगेबाबा म्हणत ?
(1) श्रीमंतांच्या शोषणात
(2) अज्ञान व आळसात
(3) आर्थिक सुबत्तेत
(4) राजकीय वृत्तीत

---

**120.** गाडगे महाराजांनी कोणती विठ्ठलभक्ती मानली ?
(1) समाजाला सुमार्गातून परावृत्त करणे
(2) धर्मशाळा न बांधणे
(3) रंजल्यागांजल्याची सेवा करणे
(4) गावाची स्वच्छता न करणे

---

**खालील उतारा वाचून प्रश्न क्र. 121 ते 125 ची उत्तरे द्या.**

आपण झाडे कां पूजतो ? अर्थात् इतर वस्तूंची पूजा करण्यास जी कारणे असतील तीच झाडांची पूजा करण्यासहि असली पाहिजेत. जो मनुष्य स्वत: पराक्रमी आहे, किंवा ज्याचा पराक्रमी पुरुषाशी कोणत्याहि प्रकारचा संबंध आहे, अथवा ज्यापासून लोकांचे कोणत्याहि प्रकारचे मोठे हित होत आहे, अशा प्रकारच्या मनुष्याला बहुधा लोकांत मान मिळतो. हाच मान वाढला म्हणजे त्याला पूजा म्हणतात; व ही पूजा करण्याची बुद्धि आपल्या अंतकरणांत उत्पन्न झाली म्हणजे आपण तिला पूज्यबुद्धि म्हणतो. वड, पिंपळ, उंबर, आपटा शमी, तुळस, बेल वगैरे झाडांविषयी आमच्या मनांत जी पूज्यबुद्धि उत्पन्न झाली आहे ती वर थोडक्यांत सांगितलेल्या कारणापैकी कोणत्या तरी कारणांनी उद्‌भवली असावी यात संशय नाही. जिरेनिअमप्रमाणे तुळशीत हवा स्वच्छ करण्याचा गुण फार आहे, म्हणून आम्ही सारे तिचे भक्त बनलो आहो किंवा, सर टी. माधव रावांनी एकदा सुचविल्याप्रमाणे बेल, तुळस आणि गवती चहा याचा चहा ऊर्फ गोडा काढा रोज सकाळी घेतल्यास वातपित्त कफाची विशेष बाधा न होता प्रकृति साफ राहण्यासारखे गुण तीत आहेत, म्हणून आम्ही तिला देवांच्या पूजेतील एक अत्यावश्यक द्रव्य केले आणि सर्व ऋतूत बायकांना तिच्या भोवती प्रदक्षिणा घालण्यास लाविले, हे निश्चयाने सांगता येत नाही ; तथापि एवढे खरे आहे की, ह्या झाडांच्या अंगच्या कसल्या तरी चांगल्या गुणाबद्दल त्याला आमच्या घरात व देवळात इतके महत्वाचे स्थान मिळाले असावे ! वड, पिंपळ, उंबर वगैरे मोठ्या गर्द छायेची झाडे आहेत, आणि त्यांपासून पांथांस व इतरास मोठे सुख होते म्हणून त्यास देवत्व प्राप्त झाले असावे असे प्रथमदर्शनी वाटण्याचा संभव आहे. पण वास्तविक कारण तसे दिसत नाही, तसे असेल तर आंबा, बकुळ, फणस वगैरे दाट छायेची झाडे पूज्य का झाली नाहीत ? आंबा व फणस छायेला चांगले असून खायलाहि कांही वाईट नाहीत ! तेव्हां फायद्याच्या दृष्टीनें हीं झाडें विशेष पूज्य व्हायला पाहिजे होतीं.

---

**121.** तुळशीत हवा स्वच्छ करण्याचा गुण कशाप्रमाणे आहे ?
(1) झाडांप्रमाणे (2) फुलाप्रमाणे (3) जिरेनिअमप्रमाणे (4) फळांप्रमाणे

---

**122.** वातपित्त कफाची विशेष बाधा कशामुळे होत नाही ?
(1) बेल, तुळस आणि गवतीचहा यांच्या काढयामुळे (2) औषध उपचार घेतल्यामुळे
(3) सर्दी झाल्यामुळे (4) ताप आल्यामुळे

---

**123.** झाडांच्या कोणत्या गुणामुळे त्यांना देवळात स्थान मिळाले ?
(1) बऱ्या गुणांमुळे (2) चांगल्या गुणांमुळे (3) वाईट गुणांमुळे (4) सद्‌गुणामुळे

---

**124.** पूजा कशाला म्हणतात ?
(1) फुले, बेल वाहतो त्याला (2) श्रद्धापूर्वक केलेले काम
(3) लोकांत मान वाढला म्हणजे त्याला (4) नारळ वाढवून अगरबत्ती लावतो त्याला

---

**125.** लोकात मान कोणाला मिळतो ?
(1) लोकांशी प्रेमळ वागणाऱ्याला (2) लोकांशी रागाने वागणाऱ्याला
(3) सर्वात श्रीमंत असणाऱ्याला (4) लोकांचे कोणत्याही प्रकारचे मोठे हित होत असेल तर

---

**कच्च्या कामासाठी जागा** /SPACE FOR ROUGH WORK

